**पु.ल. देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी मुंबई. रवींद्र नाट्य मंदिर, मिनी थिएटर इ.यांचे सुधारित भाड्याचे दरास मंजूरी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक पुलदे २०१३/ प्र.क्र. १३४/ सां.का. २**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ३ मार्च २०१५

<u>**वाचा :-**</u> १) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्रमांक: पुलअ २००५/ प्र.क्र. १०४/ सां.का.१ दिनांक १७/१०/२००६.
२) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्रमांक: पुलअ २००७ /प्र.क्र. १९०/ सां.का.१ दि. २३/१०/२००७.
३) प्रकल्प संचालक, पु. ल. देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांचे पत्र क्र. पुलअ/ ९६२/२००४, दि. १५/१२/२०१४.

<u>**प्रस्तावना**</u> :-

शासनाने संदर्भ क्र.१ येथील दि.१७/१०/२००६ च्या शासन निर्णयान्वये पु. ल. देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी संकुलातील रवींद्र नाट्य मंदिर, मिनी थिएटर, आर्ट गॅलरी इत्यादिचे भाड्याचे दर निश्चित केले होते व त्याबाबतच्या अटी व शर्ती विहित केल्या होत्या. तद्नंतर शासनाने संदर्भ क्र २ येथील दि. २३/१०/२००७ च्या शासन निर्णयान्वये भाडे दर सुधारीत केले होते. मात्र संदर्भ क्र. १ येथील दि.१७/१०/२००६ च्या शासन निर्णयानुसार विहित केलेल्या अटी व शर्ती कायम ठेवण्यात आल्या होत्या.

अकादमीसाठी वीज वापराचा दर व्यावसायिक तत्वावर आकारण्यात येतो व वीजेच्या दरात वेळोवेळी होणारी वाढ तसेच अकादमीस दैनंदिन स्वच्छता, देखभाल व दुरुस्ती यासाठी येणारा वाढीव खर्च विचारात घेऊन अकादमी संकुलातील रविंद्र नाट्य मंदिर, मिनी थिएटर, कला दालने, कलांगण, प्रदर्शन कक्ष, तालीम दालन (वातानुकुलीत / विना वातानुकुलीत) यांच्या भाडे दरामध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. तसेच संदर्भ क्र.१ येथील दि.१७/१०/२००६ च्या शासन निर्णयान्वये विहीत केलेल्या अटी व शर्तीमध्ये कालानुरुप काही बदल करण्याची बाब देखिल शासनाच्या विचाराधिन होती.

<u>**शासन निर्णय**</u> :-

शासन आता या शासन निर्णयान्वये संदर्भ क्र १ व संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णय अधिक्रमित करीत आहे.

पु.ल. देशपांडे महाराष्ट्र कला अकादमीत असणाऱ्या अत्याधुनिक सोयीसुविधा, वातानुकुलीत यंत्रणेमुळे वीजेचा वापर मोठया प्रमाणात होत असल्याने व वीजेच्या दरात वेळोवेळी होत असलेली वाढ, सुरक्षा यंत्रणेवरील वाढता खर्च, दैनंदिन स्वच्छता, देखभाल व दुरुस्ती यावरील वाढता खर्च यामुळे पु.ल. देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी संकुलातील रविंद्र नाट्य मंदिर, मिनी थिएटर, कला दालने, कलांगण, प्रदर्शन कक्ष, तालीम दालन (वातानुकुलीत / विना वातानुकुलीत) यांच्या भाडेदरामध्ये वाढ करण्याचा निर्णय शासनाने घेतला असून सुधारीत भाड्याचे दर या सोबतच्या

परिशिष्ट -अ◦, -ब◦ व -क◦ मध्ये विहीत केल्याप्रमाणे आकारण्यास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून मान्यता देत आहे.

१. पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी मार्फत आयोजित कार्यक्रमासाठी अकादमीस त्यांचे स्तरावर एका वर्षामध्ये रविंद्र नाट्य मंदिराची ३६ सत्रे , मिनी थिएटरची ३६ सत्रे , कला दालने (आर्ट गॅलरीचे) १२ दिवस राखीव ठेवण्यात येतील. ही सत्रे अकादमीस विनामुल्य वापरता येतील. या सत्रांपेक्षा अधिक सत्रे अकादमीस विनामुल्य वापरता येणार नाहीत.

२. अकादमीच्या सहकार्याने होणाऱ्या कार्यक्रमांसाठी प्रत्येक वर्षी रविंद्र नाट्य मंदिराची १२ सत्रे व मिनी थिएटरची १२ सत्रे विनामुल्य वापरता येतील. ही विनामुल्य सत्रे कोणत्या कार्यक्रमासाठी वापरावीत याबाबत प्रकल्प संचालक निर्णय घेतील.

३. सांस्कृतिक कार्य संचालनालयाच्या वतीने अकादमी संकुलातील रविंद्र नाट्य मंदिर व मिनी थिएटर येथे विविध सांस्कृतिक कार्यक्रमांचे, पुरस्कार वितरणाचे व अन्य कार्यक्रमांचे आयोजन केले जाते. सांस्कृतिक कार्य संचालनालयाच्या कार्यक्रमांसाठी प्रत्येक वर्षी रविंद्र नाट्य मंदिराची १२ सत्रे व मिनी थिएटरची ६ सत्रे विनामुल्य सत्रे म्हणून राखून ठेवण्यात येतील. परंतु सदरहू विनामूल्य सत्रांचा वापर कोणत्या कार्यक्रमांसाठी करावयाचा याचा निर्णय, संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांनी प्रकल्प संचालक पु,ल,देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी व शासन मान्यतेने घ्यावयाचा आहे. या व्यतिरिक्त सांस्कृतिक कार्य संचालनालयास अधिक सत्रे पाहिजे असल्यास त्यासाठी त्यांना नियमानुसार अनुज्ञेय भाडे व सुरक्षा अनामत रक्कम कला अकादमीमध्ये धनाकर्षाद्वारे जमा करणे आवश्यक राहील.

४. पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी व सांस्कृतिक कार्य संचालनालय यांच्याशिवाय देशातील नामांकित संस्थांकडून लोप पावत चाललेल्या कलाविष्कारांचे संवर्धन करण्याच्या दृष्टीने आयोजित करण्यात आलेल्या कार्यक्रमासाठी, राज्यातील उदयोन्मूख कलाकारांच्या कलागुणांना वाव देण्याच्या दृष्टीने आयोजित केलेल्या कार्यक्रमांसाठी, समाजातील अंध, अपंग, कॅन्सर रुग्ण व अन्य गंभीर आजाराचे रुग्ण यांनी अथवा त्यांच्यासाठी कार्यरत असणाऱ्या संस्थांनी आयोजित केलेल्या कार्यक्रमासाठी तसेच शासनास योग्य वाटतील अशा कार्यक्रमासाठी शासन मान्यतेने रविंद्र नाट्य मंदिराची १२ सत्रे व मिनी थिएटरची १२ सत्रे देण्यात येतील. एका संस्थेस एका वर्षामध्ये जास्तीत जास्त सवलतीच्या दरातील एक सत्र देण्यात येईल त्यामुळे जास्तीत जास्त विविध कलांना शासनामार्फत सहाय्य करता येऊ शकेल.

५. कोणत्याही शासकीय विभागाला, उपक्रमाला, परदेशी दुतावासाला, केंद्र शासनाला व त्यांच्या उपक्रमाला भाडेदरात कोणतीही सवलत मिळणार नाही.

६. बालनाट्यासाठी (मराठी/अमराठी) भाड्याच्या दरात २५ टक्के सवलत असेल. मात्र ही सवलत रविंद्र नाट्य मंदिर आणि मिनी थिएटर या दोन्ही सभागृहांच्या केवळ सकाळ सत्रासाठी लागू राहील.

७. मराठी कलाविष्कार म्हणजे मराठी भाषेतील नाटक, बालनाट्य, सुगम संगीत, काव्यवाचन, लोककला, चित्रपट, साहित्य विषयक कार्यक्रम, शास्त्रीय संगीत, वाद्यसंगीत इ. कार्यक्रमांचा

समावेश राहील. अमराठी कलाविष्कार म्हणजे अन्य भाषेतील नाटक, बालनाट्य, काव्यवाचन, लोककला, चित्रपट, साहित्य विषयक कार्यक्रम, सुगम संगीत, शास्त्रीय संगीत, वाद्यसंगीत इ. कार्यक्रमांचा समावेश राहील.

८. अन्य कार्यक्रम म्हणजे वरील कलाविष्कारात समाविष्ट न होणारे कार्यक्रम.

९. धार्मिक विधी आणि विवाह सोहळे यांच्यासाठी ही सभागृहे भाड्याने देण्यात येणार नाहीत.

१०.एखादा कार्यक्रम हा मराठी कलाविष्कार किंवा अमराठी कलाविष्कार किंवा अन्य कार्यक्रम किंवा बालनाट्य यापैकी कोणत्या वर्गीकरणात येतो हे ठरविण्याचा अधिकार पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमीचे प्रकल्प संचालकांना असेल. त्याकरिता कार्यक्रम सादर होण्यापूर्वी त्याचे स्वरुप समजावून घेतले जाईल. कार्यक्रम आरक्षित करताना अर्जात नमूद केलेल्या कार्यक्रमापेक्षा प्रत्यक्षात सादर झालेला कार्यक्रम वेगळया स्वरुपाचा असल्याचे आढळल्यास त्यासाठी देय असणारे शुल्क संस्थेकडून वसूल करण्यात येईल व भाडे रक्कम इतकीच दंडनीय रक्कम अनामत रकमेतून वसूल केली जाईल. याबाबत पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमीचा निर्णय अंतिम राहील.

११.या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट “अ” व “ब” मधील भाडेदर एका सत्रासाठी आहेत. एक सत्र साडेचार तासांचे असेल. त्यात कार्यक्रमाच्या पूर्व तयारीचा आणि नंतरचा रंगमंच पूर्ववत उपलब्ध करुन देण्याचा कालावधी समाविष्ट आहे. सकाळचे सत्र ९.३० ते दुपारी २.००, दुपारचे सत्र दुपारी २.३० ते सायंकाळी ७.०० व रात्रीचे सत्र सायंकाळी ७.३० ते रात्रौ १२.०० वाजेपर्यंत असे गृहीत धरण्यात येईल. संस्थेस सत्राच्या विहित वेळेतच नाट्यगृह उपलब्ध करुन दिले जाईल.

१२.पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमीच्या सोयीनुसार एखाद्या दिवशी सत्राच्या वेळेत बदल करता येईल. परंतु सत्र साडेचार तासांचेच राहील. विहित वेळेपेक्षा जादा वापर झाल्यास एका तासाकरीता एक सत्राच्या भाडे रकमेच्या २५ टक्के इतकी दंडाची रक्कम अनामत रकमेमधून वसूल करण्यात येईल.

१३.आरक्षणकर्त्यांनी कार्यक्रमाच्या विहीत सत्राच्या वेळेत उपलब्ध करुन दिलेल्या वीजेपेक्षा जादा वीजेचा वापर केल्यास सदरहू जादा वीज वापरापोटी अतिरिक्त रक्कमेची आकारणी केली जाईल व सदर रक्कम सुरक्षा अनामत रक्कमेतून वजा करण्यात येऊन उर्वरित रक्कम अदा करण्यात येईल.

१४.भाडे दराच्या रकमेएवढी सुरक्षा अनामत रक्कमेचा धनाकर्ष घेण्यात यावा. कार्यक्रमानंतर सभागृहाची व परिसराची तपासणी करुन अकादमीचे कोणतेही नुकसान झाले नसल्याची खात्री करुन व प्रशासकीय बाबींच्या पूर्ततेनंतर सुरक्षा अनामत रक्कम आरक्षणकर्त्यांस परत करण्यात येईल.

१५.परिशिष्ट अ, ब व क मधील दिलेले दर हे मूलभूत दर आहेत. वेळोवेळी अनुज्ञेय होणारे सेवा कर, इतर शुल्क आदि स्वतंतत्रपणे आकारण्यात येतील.

१६.नैसर्गिक आपत्ती किंवा अकादमीतील तांत्रिक कारणांमुळे कार्यक्रम होऊ न शकल्यास सदर संस्थेला दुसरी पर्यायी तारीख उपलब्ध करुन देण्याचा प्रयत्न करण्यात येईल. सदरहू तारखेला कार्यक्रम आयोजित करणे संबंधित संस्थेस शक्य नसेल तर भाडयापोटी जमा केलेल्या रकमेच्या ५० टक्के रक्कम आयोजकास परत करण्यात येईल.

१७.दूरचित्रवाणी कार्यक्रम / चित्रपट प्रदर्शनाकरीता त्या भाषेतील कलाविष्काराप्रमाणे भाडे दर लागू असतील.

१८. प्रत्येक सत्रासाठी आसन व्यवस्थेच्या नकाशातील (प्लॅन) उत्तमोत्तम अशी रविंद्र नाट्य मंदिराच्या बाबतीत १६ आसने व मिनी थिएटरच्या बाबतीत ४ आसने राखीव रहातील.

१९.आरक्षणकर्त्यांना त्यांनी आरक्षित केलेल्या सत्राच्या आधीचे सत्रासाठी नाट्यगृह रिकामे असले तरी आरक्षणकर्त्यांना विहीत वेळेतच त्यांना नाट्यगृह उपलब्ध करुन दिले जाईल. सत्राच्या विहित वेळेच्या आधी एक तास सभागृह उपलब्ध करुन दिल्यास सदरहू एक तासाकरीता भाडे रकमेच्या २५ टक्के जादा भाडे आकारण्यात येऊन सदरहू रक्कम सुरक्षा अनामत रक्कमेतून वजा करण्यात येईल व उर्वरित रक्कम अदा करण्यात येईल.

२०.आरक्षणकर्त्याकडून कार्यक्रमाच्या वेळेस नाट्यगृह इमारत, फर्निचर, फिटींग्स, वायरिंग, इतर साहित्याचे नुकसान झाल्यास त्यांच्या अनामत रकमेतून नुकसान भरपाई वसूल करण्यात येऊन उर्वरित रक्कम अदा करण्यात येईल. परंतु नुकसान भरपाई रक्कम अनामत रकमेपेक्षा जादा असल्यास सदरहू जादा रक्कम संस्थेस भरणा करावा लागेल.

२१. रविंद्र नाट्य मंदिर / मिनी थिएटर / कलांगण / कलादालन / प्रदर्शन दालन / तालीम दालन वापरण्यास परवानगी दिल्यानंतर कार्यक्रमाचे स्वरुप, उद्देश याविषयी आरक्षणकर्त्यांकडून दिशाभूल करण्यात आली असल्याचे निदर्शनास आल्यास सदरहू कार्यक्रम रद्द करण्याचे सर्वाधिकार अकादमीस राहतील. तसेच सदरहू कार्यक्रम रद्द केल्याबद्दल नुकसान भरपाईचा दावा करता येणार नाही व अकादमीस जाब विचारता येणार नाही.

२२.आरक्षणकर्त्यानी कार्यक्रम झाल्यानंतर अनामत रक्कम परतावा मागणी तीन वर्षांच्या आत करणे आवश्यक राहील अन्यथा तीन वर्षांनंतर सुरक्षा अनामत रक्कम व्यपगत होऊन ती शासन जमा करण्यात येईल.

२३.अर्जदारांनी आरक्षित केलेल्या जागेव्यतिरिक्त अकादमी परिसरातील अन्य इतर कोणत्याही जागेचा कोणत्याही कारणास्तव वापर त्यांना करता येणार नाही.

२४. आसन व्यवस्थेपेक्षा जास्त प्रेक्षकांना प्रेक्षागृहात प्रवेश दिला जाणार नाही.

२५. कार्यक्रम व्हिडीओ शूटींगकरीता प्रत्येक सत्रासाठी रुपये १,०००/- अधिक सेवा कर यानुसार आकारणी करण्यात येईल.

२६. कार्यक्रमाच्या भाडे रक्कमेमध्ये नाट्यगृहामध्ये ६ स्पॉट लाईटस मोफत देण्यात येतील. ६ स्पॉट लाईटस व्यतिरिक्त नाटयगृहातून घेतलेल्या प्रत्येक स्पॉटलाईटससाठी प्रत्येक भाडे आकारणीमध्ये (१००० वॅट करिता) रुपये १५०/- आकारण्यात येईल. प्रत्येक स्पॉट लाईटच्या अतिरिक्त वापराकरीता वीज बिलापोटी रुपये ७५/- याप्रमाणे आकारणी करण्यात येईल.

२७. अनामत रकमेची मूळ पावती, अर्ज व अर्जासोबत बँक खात्यासंबंधीच्या माहितीचे विवरणपत्र दिल्यानंतर अनामत रक्कम ४५ दिवसांनी आरक्षणकर्त्यांच्या खात्यामध्ये परस्पर जमा करण्यात येईल.

२८. आरक्षणकर्त्यांनी सलग २ सत्र आरक्षित केल्यास दोन सत्राच्या वेळांमधील वातानुकुलीत यंत्रणेच्या वीज बिलापोटी रुपये ५००/- आकारण्यात येतील.

२९.रविंद्र नाट्य मंदिर, मिनी थिएटरच्या आरक्षणाच्या भाडे व्यतिरिक्त प्रत्येक सत्रासाठी रुपये १,०००/- विद्युत वापराकरीता अतिरिक्त आकारण्यात येतील. तसेच वाद्यवृंद कार्यक्रमासाठी प्रत्येक सत्रासाठी रुपये १,५००/- विद्युत वापराकरीता अतिरिक्त आकारण्यात येतील.

३०.आर्ट गॅलरी व एक्झिबिशन हॉलसाठी आरक्षण भाडे व्यतिरिक्त विद्युत वापराकरीता प्रत्येकी रुपये १,५००/- अतिरिक्त आकारण्यात येतील.

३१.आर्ट गॅलरीकरीता विहित वेळेपेक्षा अतिरिक्त जादा १ तासापर्यंतच्या कालावधीकरिता रुपये १,०००/- आकारण्यात येतील.

३२.एक्झिबिशन हॉलकरीता विहित वेळेपेक्षा अतिरिक्त १ तासा पर्यंतच्या कालावधीकरिता रुपये २,०००/- आकारण्यात येतील.

३३.महिन्यातील प्रत्येक रविवारचे दुपारचे सत्र मराठी नाटकांसाठी राखून ठेवण्यात येईल.

३४. भाडे रक्कम प्रथम भरणाऱ्यास प्रथम प्राधान्य या तत्वावर आरक्षण देण्यात येईल. आरक्षण रद्द करण्याची पूर्वसूचना ३० दिवस अगोदर दिल्यास भाडे रक्कम परत करण्यात येईल.अन्यथा ती परत करण्यात येणार नाही.

सुधारीत भाडयाचे दर या शासन निर्णयाच्या दिनांकापासून अंमलात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३०३१०२३५२३३२३ असा आहे. हा डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Basawaraj G Saidanawaru

Digitally signed by Basawaraj G Saidanawaru
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tourism & Cultural Affairs, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Basawaraj G Saidanawaru
Date: 2015.03.03 16:05:13 +05'30'

**(ब.गु. सैदानवरू)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव.
३) सचिव, सांस्कृतिक कार्य यांचे स्वीय सहाय्यक.
४) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई(प्रसिध्दीकरीता)
५) उपसचिव, आस्था/सांस्कृतिक कार्य यांचे स्वीय सहाय्यक.
६) संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई.
७) प्रकल्प संचालक, पु.ल. देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, प्रभादेवी, मुंबई.
८) महालेखपाल, महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) मुंबई.
९) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१०) निवासी लेखा लेखाधिकारी, मुंबई.
११) निवासी लेखा परिक्षाधिकारी, मुंबई
१२) सर्व मंत्रालयीन विभाग.
१३) निवड नस्ती/ सां.का.२.

(शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्रमांक पुलदे २०१३/ प्र.क्र. १३४/ सां.का. २ मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनाक: ०३/०३/२०१५ चे परिशिष्ट- अ)

## परिशिष्ट-अ

## रवींद्र नाट्य मंदिर

मराठी कलाविष्कारासाठी

| सत्र | अनुज्ञेय भाडे दर प्रति सत्र (सेवाकर व इतर शुल्क वगळून) (रुपये) |
|---|---|
| **सोमवार ते शुक्रवार** | |
| सकाळ | **रु. ७,५००/-** |
| दुपार | **रु. ८,५००/-** |
| रात्रौ | **रु. ८,५००/-** |
| **शनिवार- रविवार व सार्वजनिक सुट्टी** | |
| सकाळ | **रु. १०,०००/-** |
| दुपार | **रु. १२,०००/-** |
| रात्रौ | **रु. १२,०००/-** |

अमराठी कलाविष्कारासाठी

| सत्र | अनुज्ञेय भाडे दर प्रति सत्र (सेवाकर व इतर शुल्क वगळून) (रुपये) |
|---|---|
| **सोमवार ते शुक्रवार** | |
| सकाळ | **रु. २०,०००/-** |
| दुपार | **रु. २४,०००/-** |
| रात्रौ | **रु. २४,०००/-** |
| **शनिवार- रविवार व सार्वजनिक सुट्टी** | |
| सकाळ | **रु. २२,०००/-** |
| दुपार | **रु. २७,०००/-** |
| रात्रौ | **रु. २७,०००/-** |

अन्य कार्यक्रमांसाठी

| सत्र | अनुज्ञेय भाडे दर प्रति सत्र (सेवाकर व इतर शुल्क वगळून) (रुपये) |
|---|---|
| **सोमवार ते शुक्रवार** | |
| सकाळ | **रु. २७,०००/-** |
| दुपार | **रु. ३०,०००/-** |
| रात्रौ | **रु. ३०,०००/-** |
| **शनिवार- रविवार व सार्वजनिक सुट्टी** | |
| सकाळ | **रु. ३०,०००/-** |
| दुपार | **रु. ३५,०००/-** |
| रात्रौ | **रु. ३५,०००/-** |

(शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्रमांक पुलदे २०१३/ प्र.क्र. १३४/सां.का.२ मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनाक: ०३/०३/२०१५ चे परिशिष्ट- ब)

**परिशिष्ट-ब**

**मिनी थिएटर**

मराठी कलाविष्कारासाठी

| सत्र | अनुज्ञेय भाडे दर प्रति सत्र (सेवाकर व इतर शुल्क वगळून) (रुपये) |
|---|---|
| **सोमवार ते शुक्रवार** | |
| सकाळ | **रु. ३,०००/-** |
| दुपार | **रु. ३,५००/-** |
| रात्रौ | **रु. ३,५००/-** |
| **शनिवार- रविवार व सार्वजनिक सुट्टी** | |
| सकाळ | **रु. ४,५००/-** |
| दुपार | **रु. ४,५००/-** |
| रात्रौ | **रु. ४,५००/-** |

अमराठी कलाविष्कारासाठी

| सत्र | अनुज्ञेय दर भाडे प्रति सत्र (सेवाकर व इतर शुल्क वगळून) (रुपये) |
|---|---|
| **सोमवार ते शुक्रवार** | |
| सकाळ | **रु. ८,५००/-** |
| दुपार | **रु. ९,०००/-** |
| रात्रौ | **रु. ९,०००/-** |
| **शनिवार- रविवार व सार्वजनिक सुट्टी** | |
| सकाळ | **रु. ११,०००/-** |
| दुपार | **रु. १२,०००/-** |
| रात्रौ | **रु. ११,०००/-** |

अन्य कार्यक्रमांसाठी

| सत्र | अनुज्ञेय भाडे दर प्रति सत्र (सेवाकर व इतर शुल्क वगळून) (रुपये) |
|---|---|
| **सोमवार ते शुक्रवार** | |
| सकाळ | **रु. १०,०००/-** |
| दुपार | **रु. १२,०००/-** |
| रात्रौ | **रु. १२,०००/-** |
| **शनिवार- रविवार व सार्वजनिक सुट्टी** | |
| सकाळ | **रु. १४,०००/-** |
| दुपार | **रु. १५,०००/-** |
| रात्रौ | **रु. १४,०००/-** |

(शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्रमांक पुलदे २०१३/ प्र.क्र. १३४/ सां.का. २ मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिंनाक: ०३/०३/२०१५ चे परिशिष्ट- क)

## परिशिष्ट-क

कला दालन, प्रदर्शन कक्ष, तालीम दालन व कलांगण.

| अ.क्र. | प्रकार | **अनुज्ञेय भाडे दर (सेवाकर व इतर शुल्क वगळून) (रुपये)** |
|---|---|---|
| १. | कला दालन | **रु.५,०००/- (८ तासांसाठी ) (अतिरिक्त एक तासासाठी रु.१,०००/- प्रमाणे)** |
| २. | प्रदर्शन कक्ष क्र. १ | **रु.२०,०००/- (९ तासांसाठी) (अतिरिक्त १ तासासाठी रु. २,०००/- प्रमाणे)** |
| ३. | प्रदर्शन कक्ष क्र. २ (पॅसेज एरियासह ) | **रु.२०,०००/- (९ तासांसाठी) (अतिरिक्त १ तासासाठी रु. २,०००/- प्रमाणे)** |
| ४. | तालीम दालन (वातानुकुलित) | **रु.१,०००/- (प्रत्येक २ तासांसाठी)** |
| ५. | तालीम दालन (विनावातानुकुलित) | **रु. ५००/- (प्रत्येक २ तासांसाठी)** |
| ६. | कलांगण (लोककला, पथनाट्य व शास्त्रीय संगीताचे कार्यक्रम) | **रु. ५००/- (प्रत्येक तासासाठी) (ध्वनी व वीज वापर याशिवाय होणाऱ्या कार्यक्रमांसाठी) रु.२०००/- (प्रत्येक तासासाठी) (ध्वनी व वीज वापर होणाऱ्या कार्यक्रमांसाठी)** |
| ७. | कलांगण (व्यावसायिक कार्यक्रमासाठी) | **रु. ५०,०००/- (१२ तासांसाठी) (अतिरिक्त १ तासासाठी रु.५,०००/- प्रमाणे)** |